**बृहन्मुंबईतील खाजगी अनुदानित प्राथमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळांमधील शिक्षक / शिक्षकेतर कर्मचाऱ्यांचे वेतन व भत्त्यांचे प्रदान युनियन बँक ऑफ इंडिया या बँकेमार्फत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : वेतन १२१६/प्र.क्र.३९/टीएनटी-३**
**मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२**
**दिनांक : ६ मे, २०२२.**

**वाचा** :- १) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय समक्रमांक दिनांक ३/०६/२०१७.

२) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन शुध्दीपत्रक समक्रमांक दिनांक ३०/०६/२०१७.

३) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय समक्रमांक दिनांक २८/०३/२०१८.

४) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन शुध्दीपत्रक समक्रमांक दिनांक ४/०४/२०१८.

५) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण २०२०/प्र.क्र.५१/२०/कोषा प्रशा-५, दि.१३/३/२०२०.

**प्रस्तावना :-**

बृहन्मुंबईतील खाजगी अनुदानित प्राथमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळांमधील शिक्षक / शिक्षकेतर कर्मचाऱ्यांचे वेतन व भत्त्यांचे प्रदान मुंबई जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकेमार्फत करण्याबाबत संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णय निर्गमित करण्यात आला होता. सदर शासन निर्णयाविरोधात मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे रिट याचिका क्र. २०३९/२०१७ व रिट याचिका क्र. १७५/२०१८ झाल्या होत्या. सदर याचिकांचा अंतिम निर्णय दि. ९.२.२०१८ रोजी झाला असून मा. उच्च न्यायालयाने शासनाचा दिनांक ३/६/२०१७ रोजीचा शासन निर्णय रद्द केला आहे. तसेच अधिक्षक, वेतन व भविष्य निर्वाह निधी पथक (दक्षिण/उत्तर/ पश्चिम) यांचे मेन पुल अकाउंट (पार्किंग अकाउंट) युनियन बँकेत तात्काळ उघडण्यात यावे, संबधित शाळा व शाळामधील शिक्षक /शिक्षकेतर कर्मचारी यांना त्यांचे वैयक्तिक खाते अन्य बँकेत उघडण्याचे स्वांतंत्र्य राहील, अशा सूचना देण्यात आलेल्या आहेत. त्यानुषंगाने संदर्भाधीन क्र.३ येथील शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे. तसेच संदर्भाधीन क्र.५ येथील शासन निर्णयान्वये शासकीय निधी केवळ राष्ट्रीयकृत बँकामध्येच ठेवणेबाबत शासनाचे धोरण निश्चित करण्यात आलेले आहे.

आता मा.कपिल पाटील, विधानपरिषद सदस्य यांनी उपस्थित केलेल्या विविध मुद्द्यांबाबत मा.उपमुख्यमंत्री यांच्याकडे दिनांक १२/४/२०२२ रोजी झालेल्या बैठकीमध्ये मुंबईतील शिक्षकांचे पगार आजतागायत युनियन बँकेकडे सगळे पगार वळविण्यात आलेले नाहीत, या बाबीवर चर्चा करताना असे निदर्शनास आले की, मुंबईतील ९८१ शाळांपैकी ९१७ शाळांचे वेतन युनियन बँकेमार्फत करण्यात येते. उर्वरित ६४ शाळांचे इतर बँकेमार्फत वेतन अदा करण्यात येते. यास्तव मा.मंत्री, (शालेय शिक्षण) यांनी मुंबईतील सर्व

शाळांचे बँक खाते राष्ट्रीयकृत बँकेत उघडण्याबाबतचे परिपत्रक काढण्याबाबतच्या सूचना दिल्या आहेत. त्यानुषंगाने शासन परिपत्रक काढण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन परिपत्रक :-**

मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी रिट याचिका क्र. २०३९/२०१७ व रिट याचिका क्र. १७५/२०१८ मध्ये दि. ९.२.२०१८ रोजी दिलेल्या निर्णयानुसार संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णयाद्वारे संबंधित शाळांना बँक खाते निवडीचे स्वातंत्र्य अधोरेखीत करण्यात आले आहे. तथापि, संदर्भ क्र.५ येथील शासन निर्णयातील तरतूदी विचारात घेता, मुंबईतील ज्या शैक्षणिक संस्थांची बँक खाती राष्ट्रीयकृत बँका वगळता अन्य बँकांमध्ये उघउण्यात आली आहेत, त्या शैक्षणिक संस्थांना राष्ट्रीयकृत बँकांमध्ये अथवा core banking सुविधा असलेल्या बँकांमध्ये खाते उघडण्याचे आवाहन करण्यात येत आहे. त्याबाबत आवश्यक विनंती व पाठपुरावा विभागीय शिक्षक उपसंचालक, मुंबई यांच्या स्तरावरुन करण्यात यावा.

२. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२२०५०६१६३३०२७२२१ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Sameer Anant Sawant
Date: 2022.05.06 16:35:03 +05'30'

**( समीर सावंत )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१) मा. मंत्री (शालेय शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२) मा. राज्यमंत्री (शालेय शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३) प्रधान सचिव (शालेय शिक्षण) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
४) आयुक्त ( शिक्षण ), महाराष्ट्र राज्य, पुणे
५) शिक्षण संचालक ( प्राथमिक ) , महाराष्ट्र राज्य, पुणे
६) शिक्षण संचालक ( माध्यमिक व उच्च माध्यमिक ), महाराष्ट्र राज्य, पुणे
७) विभागीय शिक्षण उपसंचालक, मुंबई
८) शिक्षण निरीक्षक(उत्तर/दक्षिण/पश्चिम), मुंबई.
९) अधिक्षक, वेतन व भविष्य निर्वाह निधी पथक (प्राथमिक/माध्यमिक), (उत्तर/दक्षिण/पश्चिम), मुंबई.
१०) निवड नस्ती-टिएनटी-३